**गुन्हे प्रकटीकरण शाखा, गुन्हा रजिस्टर क्र.५६/२०१५ (साकीनाका पोलीस स्टेशन एक्स्टॉर्शन अँड सेक्सुअल असॉल्ट केस) या गुन्ह्याच्या सुनावणीकामी विशेष सरकारी अभियोक्त्यांची नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी २०१५/प्र.क्र.१३९/पोल-१०**

गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय,

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मुंबई-४०० ०३२

दिनांक : ०५ ऑक्टोबर, २०१५

**संदर्भ** शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी २०१५/ए.एस.४२/डी-१४, दिनांक २१ ऑगस्ट, २०१५

**शासन निर्णय:**

गुन्हे प्रकटीकरण शाखा, गुन्हा रजिस्टर क्र.५६/२०१५ (साकीनाका पोलीस स्टेशन एक्स्टॉर्शन अँड सेक्सुअल असॉल्ट केस) मधून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणांमध्ये शासनाच्या वतीने कामकाज पहाण्यासाठी ॲड. श्रीमती विद्या कासले यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक २१ ऑगस्ट, २०१५ च्या अधीसूचनेद्वारे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्रीमती विद्या कासले यांना खालीलप्रमाण फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रू.१०,०००/-

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्रीमती विद्या कासले यांना अपरिणामकारक सुनावणी फी अनुज्ञेय असणार नाही.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र.बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४१८/१५/व्यय-७, दिनांक ०३.०९.२०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००६१२५३१५८३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vishnupant Joshi

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arun Vishnupant Joshi
Date: 2015.10.06 12:53:45 +05'30'

**( अ.वि.जोशी )**

कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, मुंबई.
३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई .
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. ॲड.श्रीमती विद्या कासले, २५/२६, डी.एन.मंझील, कॉंग्रेस हाऊस, व्ही.पी.रोड, मुंबई ४०० ००४
७. विधी व न्याय विभाग (का १४), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).